कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य सन २०१४-१५ (योजनांतर्गत)

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र.कृषीअ-२०१५/प्र.क्र.६३/ऊर्जा-३,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई — ४०००३२,

दिनांक: ३१ मार्च, २०१५

संदर्भ :- १. म.रा.विद्युत वितरण कंपनी मर्यादित मुंबई यांचे क्र. महाव्यवस्थापक (भा.ख.वि.)/१२३ दिनांक १२ मार्च २०१५ चे पत्र

**प्रस्तावना :-**

कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सहाय्यक अनुदान देण्याची तरतूद आहे. त्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रु.१५०,००,००,०००/-(रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. त्यामधून आतापर्यंत रु.७५,१८,००,०००/-(रुपये पंच्याहत्तर कोटी अठरा लाख फक्त)इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण)यांना वितरीत करण्यात आहे. आता महावितरण कंपनीने संदर्भाधीन दिनांक १२ मार्च २०१५ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार उर्वरित असून रु. ७४,८२,००,०००/- (रुपये चौ-याहत्तर कोटी ब्याऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रु. ७४,८२,००,०००/- (रुपये चौ-याहत्तर कोटी ब्याऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम रोखीने वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३ वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज,०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०६)कृषी पंप संचाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी/ग्रामीण विद्युतीकरणासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यासं सहाय्यक

अनुदान (२८०१२६८९) ३१ सहाय्यक अनुदान " या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु. ७४,८२,००,०००/- (रुपये चौ-याहत्तर कोटी ब्याऐंशी लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेली रक्कम वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅश फ्लोच्या (मासिक वितरण) मर्यादेत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१४९/१४६१ दिनांक २७/०३/२०१ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ १८६/२०१५, व्यय-१६, दि.३०/०३/२०१५ अन्वये मिळालेल्या त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०३३११७३६३२८८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.03.31 17:47:04 +05'30'

(वि.म.राजुरकर)

शासनाचे अवर सचिव

**प्रत -:**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
२) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा मुंबई-०५
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -२, नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप / रालेवि-१), मुंबई.

७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

८) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई४०० ०५१.

९) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) विशेष कार्य. अधिकारी (उर्जा-५), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई-३२

११) क.अ.(प्रशासन-१), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई-३२

१२) वित्त विभाग, /(अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती /साऊ / व्य-१६) मंत्रालय, मुंबई, ३२.

१३) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४००००१.

१४) व्यवस्थापकीय संचालक, महासूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.

१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.